**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील पदांवर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारास नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससेप्रे-४४२१/प्र.क्र.२३३/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२२

वाचा :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.५(१)(२४)/१०९६८/ अठ्ठावीस, दिनांक १०.१२.२०२१

**प्रस्तावना:-**

शासनाच्या दिनांक १८.०९.२०१० रोजीच्या मागणीपत्राच्या अनुषंगाने महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ ( प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम पदांसाठी घेण्यात आलेल्या परीक्षेचा निकाल दिनांक १६.०२.२०१३ रोजी प्रसिध्द करण्यात आला. त्यानुसार यापूर्वी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या दिनांक १६.०२.२०१३ व दिनांक १७.०९.२०१४ रोजीच्या पत्रान्वये सदर पदाच्या विज्ञापित ७४ जागांपैकी ७३ जागांवर नियुक्तीकरीता गुणवत्तेच्या आधारे उमेदवारांच्या आयोगाकडून शिफारशी करण्यात आल्या आहेत. उर्वरित एका अराखीव पदाचा निकाल मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार राखून ठेवण्यात आला होता. आता मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठाने मूळ अर्ज क्र.१०५/२०१७ मध्ये दिनांक ३०.०८.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने त्यांच्या दिनांक १०.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये अराखीव प्रवर्गाच्या एका रिक्त जागेवर श्री. नागेश शंकरराव मापारी यांची अराखीव प्रवर्गातून शिफारस केली आहे.

२. श्री. नागेश शंकरराव मापारी यांना पदस्थापना देण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि. १४.०७.२०२१ मधील विभागीय संवर्ग वाटपाच्या तरतूदीनुसार श्री. मापारी यांचेकडून महसूली विभागाचा विकल्प घेण्यात आला आहे. श्री. मापारी यांनी दिलेला विकल्प विचारात घेऊन त्यांना "औरंगाबाद" महसूली विभाग वाटप करण्यात आला आहे. सदर महसूली विभागात श्री. मापारी यांच्या पदस्थापनेबाबत पुढील आदेश देत आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम या संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त असलेल्या पदावर वेतन पे बॅन्ड-रु. एस-२०: ५६१००-१७७५०० अशा सुधारित वेतन संरचनेत शिक्षणाधिकारी व तत्सम या संवर्गातील स्तंभ क्र.(४) मध्ये नमूद पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव | निवड झालेल्या पदाचा प्रवर्ग | नियुक्तीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. नागेश शंकरराव मापारी | खुला | शिक्षणाधिकारी (माध्यमिक) लातूर |

२. सदर पदस्थापना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१. सदरची नियुक्ती ही महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे प्रलंबित मूळ अर्ज क्र.९२५/२०१७ च्या अंतीम आदेशाच्या अधिन राहून देण्यात येत आहे. तसेच सदर प्रकरणी विविध न्यायालयात प्रलंबित असलेल्या सेवाविषयक प्रकरणांच्या निकालाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

२. राज्याच्या प्रशिक्षण धोरणाच्या अनुषंगाने सदर उमेदवारांना विहीत पायाभूत प्रशिक्षण पूर्ण करणे आवश्यक राहील. सदर प्रशिक्षण संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांचेमार्फत आयोजित करण्यात येईल. तसेच सदर प्रशिक्षणाचा कालावधी व रूपरेषा ठरविण्याचे अधिकार संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांना राहतील.

३. सदर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांचा परिविक्षा कालावधी दोन वर्षाचा राहील. सदर उमेदवारांची पहिली वेतनवाढ त्यांच्या एक वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण झाल्यानंतर व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी पूर्ण केल्यानंतर देण्यात येईल.

४. परिविक्षा कालावधीत सदर उमेदवारांना प्रचलित नियमाप्रमाणे आवश्यक असणारी विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील. परिविक्षा कालावधीत त्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न केल्यास कोणतीही पूर्वसूचना न देता, त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

५. उपरोक्त उमेदवार यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसे न झाल्यास संबंधित उमेदवारांचे वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणांच्या अधिनतेने सदर उमेदवारांची जेष्ठता राहील. सदर उमेदवारांनी त्यांच्या नियुक्तीच्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तसे सकारण लेखी कळवून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या

गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांना जेष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्यांची जेष्ठता धरण्यात येईल.

७. वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ नुसार परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेतील तरतुदी सदर उमेदवारांना लागू राहतील. तसेच दिनांक १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्ती वेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांबाबत वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंनियो-१००५/१२६/ सेवा-४, दिनांक १८ ऑगस्ट, २००९ मधील तरतुदी सदर उमेदवारांना लागू राहतील.

८. संबंधित उमेदवारांनी त्यांच्या शैक्षणिक अर्हतेबाबत व इतर आवश्यक प्रमाणपत्राच्या मूळ प्रती तपासणीकरीता व साक्षांकित प्रतींचा संच पदस्थापना स्विकारण्याच्या वेळी संबंधित कार्यालय प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांच्याकडे सादर कराव्यात आणि कार्यालय प्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी प्रमाणपत्रांची तपासणी करून संबंधित उमेदवाराला रुजू करून घ्यावे.

९. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संबंधित उमेदवारांनी सादर केलेली सर्व कागदपत्रे संबंधित सक्षम यंत्रणेमार्फत तपासण्याच्या सूचना केलेल्या आहेत. त्यामुळे तपासणीअंती उमेदवारांनी सादर केलेली कागदपत्रे खोटी अथवा बनावट आढळल्यास त्यांच्या सेवा कुठलीही पूर्व सूचना न देता तात्काळ संपुष्टात आणण्यात येतील.

१०.संबंधित उमेदवारांनी या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसात नियुक्तीच्या पदावर रुजू व्हावे. विहीत कालमर्यादेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सदर नियुक्तीमध्ये स्वारस्य नसल्याचे समजण्यात येईल आणि सदर नियुक्तीकरीता संबंधित उमेदवारांचा हक्क आपोआप संपुष्टात येईल.

११.महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०२१ मधील नियम क्र.८ नुसार वरील उमेदवारांची ज्या महसूली विभागात नियुक्ती झाली आहे, त्या विभागात किमान तीन वर्षे इतका सेवा कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील.

१२.शासकीय सेवेत रुजू झाल्यानंतर ज्या उमेदवारांना शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यांनी एक महिन्याची पूर्वसूचना शासनास देणे आवश्यक राहील अन्यथा त्यांना एक महिन्याचे वेतन शासनाकडे जमा करावे लागेल.

१३.उपरोक्त उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवास भत्ता देण्यात येणार नाही.

१४.वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिकाऱ्यांना लागू असलेले प्रचलित नागरी सेवा विषयक सर्वसाधारण नियम सदर उमेदवारांना लागू राहतील.

३. हे आदेश प्राप्त होताच संबंधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व याबाबतचा अहवाल संबंधित कार्यालय प्रमुखांनी आयुक्तांमार्फत शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२२०२२३१८०७३३१६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.02.23 19:07:18 +05'30'

**( टि. वा. करपते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. नागेश शंकरराव मापारी,४६, भाग्यनगर, जुना जालना,जालना.

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. सर्व शिक्षण संचालक
३. संचालक, महाराष्ट्र विद्या प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
यांना सदर उमेदवारांच्या पायाभूत प्रशिक्षणासंदर्भातील कार्यवाही तात्काळ करण्याच्या विनंतीसह.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), I व II महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), I व II महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, नाशिक
८. विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक
९. शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / निरंतर),नाशिक.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
११. उपसचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५१/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई ४०० ०२१ (पत्राव्दारे)
१२. सर्व सहसचिव/ उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१३. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
१४. निवडनस्ती/ प्रशा-२ कार्यासन.

**प्रत माहितीस्तव :-**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (शालेय शिक्षण), यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेते (विधानसभा/ विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक
५. मा.विधानसभा सदस्य/ मा.विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक.